**महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याकांकडून चालविण्यात येणाऱ्या शैक्षणिक संस्थांना धार्मिक/ भाषिक अल्पसंख्याक संस्था म्हणून दर्जाची मान्यता देण्यासाठी कार्यपध्दती, अटी व शर्ती विहित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**अल्पसंख्याक विकास विभाग,**

शासन शुध्दीपत्रक क्रमांक : अविवि-२०११/प्र.क्र.२५/११/कार्या-५,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १८ जून, २०११.

वाचा- १. शासन अधिसूचना, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. असंस-२००८/ प्र.क्र.१४९/०८/का.-१, दि.४ जुलै,२००८.

२. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अशैसं-२००८/ प्र.क्र.१३३/२००८/का.-१, दि.४ जुलै,२००८.

३. शासन पूरकपत्र,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अशैसं-२००९/ प्र.क्र.१४८/ २००९/का.५, दि.२७.१०.२००९.

४. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१०/प्र.क्र.५९/१०/का.-५, दि.१ एप्रिल, २०१०.

**शुध्दीपत्रक :-**

संदर्भाधीन क्र.(२) येथील शासन निर्णय, दि.४ जुलै,२००८ अन्वये राज्यातील अल्पसंख्याकांकडून चालविल्या जाणाऱ्या शैक्षणिक संस्थांना धार्मिक /भाषिक अल्पसंख्याक संस्था म्हणून दर्जाची मान्यता प्रदान करण्याबाबतची कार्यपध्दती, अटी व शर्ती विहीत करण्यात आली असून, यामध्ये संदर्भाधीन क्र.(३) व (४) येथील शासन पूरकपत्र व शासन निर्णयान्वये आवश्यक सुधारणा करण्यात आल्या आहेत. आता अल्पसंख्याक शैक्षणिक संस्थाना दर्जा प्रमाणपत्र प्रदान करण्याची प्रक्रिया अधिक गतिमान व्हावी यासाठी शासन निर्णय, दि.४ जुलै,२००८ व शासन पूरकपत्र, दि.२७.१०.२००९ मधील काही मूळ तरतुदीमध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

**१)**, i)- संदर्भाधीन क्र.(२) येथील शासन निर्णय, दिनांक ४ जुलै,२००८ तील परिच्छेद (२), १ मधील पहिल्या ओळीतील **"किंवा पत्राव्दारे"** हा शब्द वगळण्यात येत आहे.

ii)- तसेच याच परिच्छेदामधील सहाव्या ओळीतील "तथापि, खालील परिच्छेद (५) मध्ये विहीत केलेल्या अटी अशा सर्व संस्थाना लागू असतील....." या वाक्यानंतर **"ज्या शैक्षणिक संस्थाना अल्पसंख्याक विकास विभागाखेरीज इतर विभांगाकडून (जसे-शालेय शिक्षण विभाग, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,सामान्य प्रशासन विभाग) तात्पुरत्या स्वरुपात अल्पसंख्याक दर्जाची मान्यता प्रदान करण्यात आली आहे, अशा सर्व अल्पसंख्याक दर्जा मान्यताप्राप्त शैक्षणिक संस्थानी तात्पुरत्या स्वरुपातील दर्जा कालावधी समाप्तीनंतर या विभागाकडे कायमस्वरुपी दर्जा प्रमाणपत्रासाठी नव्याने अर्ज करणे आवश्यक राहील. ".** असे वाचण्यात यावे

**२)** संदर्भाधीन क्र.(२) येथील शासन निर्णय, दिनांक ४ जुलै,२००८ तील परिच्छेद (४),२)- "संस्थेच्या व्यवस्थापन समितीच्या विद्यमान विश्वस्त/सदस्य यांची नावे दर्शविणाऱ्या धर्मादाय आयुक्तांमार्फत प्रदान करण्यात आलेल्या अनुसूची-१ ची प्रत." याऐवजी **"संस्थेच्या व्यवस्थापन समितीच्या विश्वस्त/सदस्य यांची नावे दर्शविणाऱ्या धर्मादाय आयुक्तांमार्फत प्रदान करण्यात आलेल्या अनुसूची-१ ची प्रत."** असा वाचण्यात यावा.

**३)** संदर्भाधीन क्र.(२) येथील शासन निर्णय, दिनांक ४ जुलै,२००८ तील परिच्छेद (४),३)- "संस्थेच्या व्यवस्थापन समितीच्या विश्वस्त/सदस्यांच्या नावात बदल झाला असल्यास धर्मादाय आयुक्तांनी संस्थेस प्रदान केलेल्या फेरफार अहवालाची प्रत." याऐवजी **"संस्थेच्या व्यवस्थापन समितीच्या विश्वस्त/सदस्यांच्या नावात**

**बदल झाला असल्यास धर्मादाय आयुक्तांनी संस्थेस प्रदान केलेल्या फेरफार अहवालाची व अनुसूची-३ ची प्रत."** असा वाचण्यात यावा.

**४)** संदर्भाधीन क्र.(२) येथील शासन निर्णय, दिनांक ४ जुलै,२००८ तील परिच्छेद (५), ३ मधील चौथ्या ओळीतील "प्राधिका-यांना त्याबाबत कळविणे आवश्यक आहे..." या वाक्यानंतर **"अल्पसंख्याक दर्जा मान्यताप्राप्त शैक्षणिक संस्थानी प्रत्येक तीन वर्षानंतर आपल्या संस्थेची अद्यावत अनुसूची-१ (फेरफार अहवाल व अनुसूची-३ सह) ची प्रमाणित प्रत सक्षम प्राधिकारी यांना सादर करावी."** असे वाचण्यात यावे.

**५)** संदर्भाधीन क्र.(३) येथील शासन पूरकपत्र,दि.२७.१०.२००९ तील क्र.६-"अर्जदार संस्थेचे सदस्य/ विश्वस्त महाराष्ट्रातील रहिवासी असावेत" याऐवजी **"अर्जदार संस्थेचे सदस्य/विश्वस्त महाराष्ट्रातील रहिवासी असावेत व यासाठी संस्थेचे ट्रस्टी/विश्वस्त महाराष्ट्रातील रहीवासी असल्याबाबत पुराव्याची स्वःसाक्षांकित प्रती (उदा- निवडणूक ओळखपत्र/पासपोर्ट/विद्युत बील /दूरध्वनी बील/रेशनकार्ड/ड्रायव्हींग लायन्सस/अधिवास प्रमाणपत्र** (Domicile certificate) **वा रहिवास प्रमाणपत्र अर्जासोबत सादर कराव्यात."** असा वाचण्यात यावा.

**६)** शैक्षणिक संस्थानी ट्रस्टी/विश्वस्तांच्या धार्मिक व भाषिक संबंध्दतेबाबत अन्य नमूद पुराव्याच्या स्वःसाक्षांकित प्रतींसोबत, सोबतच्या **प्रपत्र-"क"** च्या विहीत नमुन्यातील संबंधित सदस्यांचे/विश्वस्तांचे धार्मिक व मातृभाषेविषयक रु.१००/-च्या अर्धन्यायिक स्टॅम्पपेपरवरील मूळ प्रतिज्ञापत्र अर्जासोबत सादर करणे आवश्यक राहील.

**७)** शैक्षणिक संस्थानी अल्पसंख्याक दर्जा मान्यतेसाठी अर्ज सादर करताना सोबतच्या **प्रपत्र-ड** मध्ये नमूद सर्व कागदपत्रे, पृष्ठांकन क्रमांक नमूद करुन क्रमवारीनुसार जोडावीत. **प्रपत्र-ड** मध्ये नमूद सर्व कागदपत्रे, पृष्ठांकन क्रमांकासह तसेच क्रमवारीनुसार अर्जासोबत जोडलेली नसल्यास असे अपूर्ण अर्ज स्वीकारले जाणार नाहीत.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०६१८१३०७४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही /-**
**( एस.एस.काद्री )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
प्रबंधक, मूळ न्याय शाखा/अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ, नागपूर
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद
प्रबंधक, लोक आयुक्त कार्यालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
धर्मादाय आयुक्त, मुंबई / सर्व सहायक धर्मादाय
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
संचालक, उच्च शिक्षण, मुंबई
संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे
शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्चमाध्यमिक) व इतर.
निवडनस्ती

संबंधित सदस्याचे छायाचित्र.

## प्रपत्र- क .

## प्रतिज्ञापत्र.

मी श्री/श्रीमती.........................................................................,वय.........., राहणार............................,संस्थेचे नावं............................................... ....... ..., प्रतिज्ञापूर्वक लिहून देतो/देते की, मी ................ या धार्मिक व/किंवा ............... या भाषिक अल्पसंख्याक लोकसमूहातील सदस्य आहे. मी असे प्रतिपादन करतो/करते की, संबंधित धार्मिक व/किंवा भाषिक अल्पसंख्याक लोकसमूहातील सदस्य असल्याबाबत नमूद केलेली माहीती सत्य व बरोबर असून, ती असत्य व खोटी असल्याचे आढळून आल्यास माझ्याविरुध्द तसेच संबंधित अल्पसंख्याक दर्जाप्राप्त संस्थेविरुध्द कायदेशीर/दंडात्मक कार्यवाही केली जाऊ शकते. तसेच या असत्य व खोटया माहीतीच्या परिणामी संबंधित शैक्षणिक संस्थेस प्रदान करण्यात आलेली अल्पसंख्याक दर्जाची मान्यता मागे घेण्याबाबत सक्षम प्राधिकारी यांच्याकडून कार्यवाही होऊ शकते, याची मला पूर्ण जाणीव आहे.

१) संबंधित सदस्याचे पूर्ण नाव व सही-

२) संबंधित संस्थासचिवांचे पूर्ण नाव व सही-

३) संबंधित संस्थाअध्यक्षांचे पूर्ण नाव व सही-

ठिकाण :-

दिनांक :-

---------------

**प्रपत्र- ड**

**<u>तपासणी सूची-</u>**

**विषय- शासन निर्णय, दिनांक ४ जुलै, २००८ अनुसार शैक्षणिक संस्थानी अल्पसंख्याक दर्जा मान्यतेसाठीच्या अर्जासोबत सादर करावयाची कागदपत्रे.**

| अनु. क्र. | कागदपत्रांचा तपशील | पृष्ठ क्रमांक | फक्त कार्यालयीन वापरासाठी. |
|---|---|---|---|
| १ | रु.५०००/- इतके ना-परतावा संस्करण शुल्क भरल्याची मूळ प्रत. | | |
| २ | विहीत प्रपत्र-अ - अर्जाचा नमुना. | | |
| ३ | प्रपत्र-ब-रु.१००/- च्या कोर्ट फि स्टॅम्पपेपरवरील प्रतिज्ञापत्र - | | |
| ४ | रु.५००/- चे कोर्ट फी स्टॅम्प. | | |
| ५ | अ) सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्ट- १८६० (Societies Registration Act, 1860) किंवा,<br>ब) मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा- १९५० (Bombay Public Trust Act, 1950) | अ)<br>ब) | अ)<br>ब) |
| ६ | संस्थेच्या ट्रस्ट डीडची प्रमाणित प्रत. सदर प्रमाणित ट्रस्ट डीडमध्ये "संबंधित अल्पसंख्याक संस्था त्या धार्मिक/भाषिक अल्पसंख्याक समाजाच्या हिताचे संरक्षण करण्यासाठी स्थापन करण्यात आली आहे" असा उददेश आवश्यक राहील. | | |
| ७ | सहाय्यक धर्मादाय आयुक्त यांनी प्रमाणित केलेल्या आपल्या संस्थेच्या मूळ विश्वस्तांच्या नावांची यादी/ अनुसूची-१ ची प्रत. (शैक्षणिक संस्थेच्या व्यवस्थापन समितीवरील किमान २/३ विश्वस्त संबंधित अल्पसंख्याक समाजाचे असणे आवश्यक राहील.). | | |
| ८ | मूळ विश्वस्तामध्ये बदल झाला असल्यास सहाय्यक धर्मादाय आयुक्त यांनी प्रमाणित केलेल्या फेरफार नोंद/ अनुसूची -३ ची प्रत. (शैक्षणिक संस्थेच्या व्यवस्थापन समितीवरील किमान २/३ विश्वस्त संबंधित अल्पसंख्याक समाजाचे असणे आवश्यक राहील.) | | |
| ९ | संस्था "शैक्षणिक अभ्यासक्रम" चालवित असल्याबाबत आदेशाच्या प्रती | | |
| १० | संस्थेच्या ट्रस्टी/विश्वस्तांच्या धार्मिक व भाषिक संबंध्दतेबाबत पुराव्याची स्वःसाक्षांकित प्रत. (उदा- प्रवेश निर्गमन उतारा/शाळा सोडल्याचा दाखला/ बॅपटिस्म प्रमाणपत्र/दिक्षा प्रमाणपत्र/संबंधित अल्पसंख्याक समाजाच्या संघटनेने किंवा धर्मप्रमुखांने दिलेले प्रमाणपत्र तसेच संबंधित सदस्यांने/विश्वस्ताने आपल्या धार्मिक व मातृभाषेविषयी प्रपत्र-"क" च्या विहीत नमुन्यात दिलेले प्रतिज्ञापत्र.) | | |
| ११ | संस्थेच्या ट्रस्टी/विश्वस्तांच्या महाराष्ट्रातील रहीवासी असल्याबाबत पुराव्याची स्वःसाक्षांकित प्रत.(उदा-निवडणूक ओळखपत्र/पासपोर्ट/विद्युत बील/ दूरध्वनी बील/रेशनकार्ड/ड्रायव्हींग लायसन्स/अधिवास वा रहिवास प्रमाणपत्र) | | |
| १२ | शैक्षणिक संस्थेस दि.११/६/२००७ पूर्वी विशिष्ट आदेश किंवा पत्राव्दारे अथवा शालेय शिक्षण विभाग/उच्च व तंत्र शिक्षण विभाग तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.११/६/२००७ अन्वये अल्पसंख्याक संस्था म्हणून तात्पुरत्या कालावधीसाठी मान्यता प्रदान करण्यात आली असल्यास आदेशाच्या प्रती. | | |

***********